केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेअंतर्गत कृषी यांत्रिकीकरण उपअभियान सन २०१६-१७ मध्ये राज्यात अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राबवविण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१६/प्र.क्र.२७/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १५ मार्च, २०१७

वाचा-

१) शासन निर्णय क्रमांक:कृयांउ-१०१४/ प्र.क्र.१२४/४अे,दिनांक.०३ जून,२०१४
२) केंद्र शासनाचे पत्र क्र.३-१०/२०१३ M&T (I&P), दिनांक २२ एप्रिल,२०१६
३) शासन निर्णय क्रमांक:कृयांउ-१०१६/प्र.क्र.२७/४अे,दिनांक-६ जून,२०१६
४) केंद्र शासनाचे उपअभियानासंदर्भात http://farmech.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना.
५) केंद्र शासनाचे पत्र क्र.३-१/२०१५- M&T (I&P) दिनांक. १६ मे,२०१६
६) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३ दिनांक.२० एप्रिल,२०१६.
७) शासन निर्णय क्र. कृयांस-१०१६/प्र.क्र.२७/दिनांक.२० जून,२०१६.
८) शासन शुध्दीपत्रक क्र. कृयांस-१०१६/प्र.क्र.२७/दिनांक.२२ सप्टेंबर,२०१६.
९) केंद्र शासनाचे पत्र क्र.३-१/२०१५- M&T (I&P) दिनांक. २३ सप्टेंबर,२०१६
१०) शासन निर्णय क्र. कृयांस-१०१६/प्र.क्र.१७१/४अे/दिनांक.१५ ऑक्टोबर,२०१६.
११) शासन निर्णय क्र. कृयांस-१०१६/प्र.क्र.१७१/४अे/दिनांक.१५ नोव्हेंबर,२०१६

प्रस्तावना-

राज्यात केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने मंजुरी दिलेल्या केंद्र हिश्श्यापोटी रु.१५००.०० लाख व राज्य हिश्याचा रु.१०००.०० लाख निधी, अशा एकूण रु. २५००.०० लाख निधीचा कार्यक्रमास सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.३ येथील दि. २ जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्याता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सदर उपअभियान राज्यात सन २०१६-१७ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.५ येथील दि. १६ मे, २०१६ च्या पत्रान्वये रु.१५००.०० लाख वितरीत केले असल्याचे कळविले आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन अ.क्र.०९ येथील दि. २३ सप्टेंबर, २०१६ च्या पत्रान्वये सन २०१५-१६ या वर्षातील रु.१७०.९१७ लाख एवढया रकमेचा अखर्चित कार्यक्रम सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यास

पुनर्जिवीत करुन दिलेला आहे. सन २०१६-१७ या वर्षासाठी उपलब्ध करुन दिलेला निधी व पुनर्जिवीत कार्यक्रमाच्या निधीचा प्रवर्गनिहाय तपशील खालील प्रमाणे आहे.

या वर्षासाठी उपलब्ध करुन दिलेला निधी व पुनर्जिवीत कार्यक्रमाच्या निधीचा प्रवर्गनिहाय तपशील खालील प्रमाणे आहे.

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | वर्ष | सर्वसाधारण | अनुसूचित जाती | अनुसूचित जमाती | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १. | २०१६-१७ (नियमीत) | १०९५.०० | २२५.०० | १८०.०० | १५००.०० |
| २. | २०१५-१६ (पुर्नर्जिवित) | २१.७२४ | ६९.६२४ | ८९.५६९ | १७०.९१७ |
| **एकूण** | | **१११६.७२४** | **२९४.६२४** | **२६९.५६९** | **१६७०.९१७** |

कृषी यांत्रिकीकरण उप-अभियान सन २०१६-१७ मध्ये अनुसूचित जाती प्रवर्गासाठी राबविण्यासाठी केंद्र हिस्सा रु.२६७.०० लाख व त्याप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा रु.१७८.०० लाख संदर्भाधीन अ.क्र. ११ येथील दि. १५ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित केंद्र हिश्श्यासाठी आवश्यक निधी रु.२७.६२४ लाख व त्याचप्रमाणात आवश्यक राज्य हिस्सा रु.१८.४१६ लाख असा एकूण रु. ४६.०४ एवढा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत - कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राज्यात, अनुसूचित जाती प्रवर्गासाठी, सन २०१६-१७ मध्ये राबविण्यासाठी तसेच सन २०१५-१६ या वर्षातील अखर्चित निधीचा कार्यक्रम सन २०१६-१७ या वर्षात राबविण्यासाठी, केंद्र हिस्सा रु.२७.६२४ लाख (अक्षरी रुपये: सत्तावीस लाख बासष्ठ हजार चारशे फक्त) व राज्य हिस्सा रु.१८.४१६ लाख (अक्षरी रुपये: अठरा लाख एकेचाळीस हजार सहाशे फक्त) अशा एकूण रु.४६.०४ लाख (अक्षरी सेहेचाळीस लाख चार हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१६-१७ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक- डी-३**
२४०१-पीक संवर्धन,
(००) ७८९- अनुसूचित जाती उपयोजना
(००)(१३) कृषी उन्नती योजना - कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो.)
(केंद्र हिस्सा ६०%) (अनुसूचित जाती उपयोजना)
(२४०१A३०५) ३३ -अर्थसहाय्य

**मागणी क्रमांक- डी-३**
२४०१-पीक संवर्धन,
(००)७८९ -अनुसूचित जाती उपयोजना
(००)(१४) कृषी उन्नती योजना - कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (कें.पु.यो.)
(राज्य हिस्सा ४०%) (अनुसूचित जाती उपयोजना)
(२४०२ A३१४) ३३ -अर्थसहाय्य.

३. मंजूर निधी उपअभियनांतर्गत ३ व ४ च्या घटकांची अमलबजावणी तसेच Flexi-Fund साठीच खर्च होईल, याची कृषी संचालक (नि.व.गु.नि), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी काटेकोरपणे दक्षता घ्यावी.
४. सदर निधी अनुसूचित जाती व नवबौध्द शेतकऱ्यांसाठीच खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.
५. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र ३ येथील शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
६. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ.क्र.४ येथील केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
७. सदर निधी खर्च करण्यासाठी कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, सदर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.
८. सदर अभियान राज्यात सन २०१६-१७ मध्ये राबविण्याच्या दृष्टीने निधी वितरीत करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांनी पुढीलप्रमाणे आहरण

| अ.क्र. | स्तर | पदनाम |
|---|---|---|
| १. | आयुक्तालयस्तर | सहाय्यक संचालक (लेखा-१),कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | विभागस्तर | विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी |
| ३. | जिल्हास्तर | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |
| ४. | तालुकास्तर | तालुका कृषी अधिकारी |

९. या योजनेचा खर्च मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत होईल, याची दक्षता कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी. उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेतच कार्यक्रम राबविण्याची आवश्यक ती दक्षता कृषि संचालक (निविष्ठ व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक-२० एप्रिल,२०१६ व दिनांक.८ फेब्रुवारी,२०१७ च्या परिपत्रकान्वये अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सामाजिक न्याय विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५११००५८७२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth H Chaware

Digitally signed by Siddharth H Chaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Departmemt, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b4967ce0b5887c76156645efd775bffa84d471ca667907fda2cdbd1c76d7831f, cn=Siddharth H Chaware
Date: 2017.03.15 11:27:04 +05'30'

**( सिध्दार्थ चवरे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
२. मा. मंत्री (आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री (कृषी व फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास विभाग) यांचे खाजगी सचिव
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
६. कुलगुरू, कृषी विद्यापीठे (सर्व )
७. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय,पुणे (१० प्रती)
८. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
१३. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग, गोरेगाव (पूर्व ) मुंबई- ६५
१४. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१५. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१६. सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हा परिषद)
१७. सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २, मुंबई-नागपूर/ (लेखा परिक्षक) /(लेखा व अनुज्ञेयता)
१९. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२१. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई
२२. अध्यक्ष,सर्व जिल्हा परिषदा
२३. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२४. सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग
२५. निवड नस्ती (कार्यासन -४अे).